**वाहनांवरील फिरते दूध विक्री केंद्राव्दारे आरे दूधआरे सह उत्पादने / दुग्धजन्य पदार्थ , विक्री करण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : दुवियो १३१६/ प्र.क्र.६३/ पदुम-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-**

१. मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई,यांचे दि.४/५/२०१५ व दि.१२/३/२०१८ चे पत्र
२. आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र.आदुवि-२१(ड)/बृमुंदूयो/यशोधन/आरे/दूध विक्री/३०/ २०१५/५२७७, दि.१९/०८/२०१५.
३. आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्रक्र.आदुवि-२१(ड)/बृमुंदूयो/यशोधन/आरे/दूध विक्री/३०(२०१५)/२०१८/३५१४, दि.०३/०८/२०१८.

**प्रस्तावना :-**

मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई यांच्या दि.१४/०५/२०१५ रोजीच्या पत्रान्वये बृहन्मुंबई क्षेत्रात आरे दूध व दुग्धजन्य पदार्थ वाहनावरील फिरते दूध विक्री केंद्राव्दारे विकण्यास परवानगी देण्याची विनंती केलेली आहे. या फिरत्या दूध विक्री केंद्रास मान्यता मिळाल्यास आरे दूध व उपपदार्थ थेट ग्राहकांच्या घरापर्यंत पोहोचवून विक्रीमध्ये वाढ होईल, बृहन्मुंबईतील बेरोजगारांना रोजगाराच्या संधी उपलब्ध होतील, तसेच आरे दूध व दुग्धजन्य पदार्थांची प्रसिध्दी होईल, असे त्यांच्या प्रस्तावात नमूद केलेले आहे. त्याच प्रमाणे दि.१२/०८/२०१८ रोजीच्या पत्रान्वये वाहन खरेदीसाठी शासनाच्या कोणत्याही प्रकारच्या अर्थसहाय्याची मागणी नसून बँक कर्ज लाभार्थी हिस्सा व यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर गृप यांच्या माध्यमातून पूर्ण केले जाणार आहे. त्याचप्रमाणे यासाठी लागणाऱ्या आवश्यक त्या सर्व परवानग्या संबंधित विभागांकडून निवडलेल्या लाभार्थ्यांमार्फत घेण्यात येणार आहेत.

मे. यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर गृप यांच्या प्रस्तूत प्रस्तावास शासनाची मान्यता देण्याबाबत आयुक्त दुग्धव्यवसाय यांच्या दि. १९/०८/२०१५ व दि.०३/०८/२०१८ च्या पत्रान्वये शिफारस करण्यात आलेली आहे. शासनाच्या आरे दूध व दुग्धजन्य पदार्थांच्या विक्रीस सहाय्य होणार आहे. ग्राहकांना त्यांच्या निवासस्थानी दुग्धजन्य पदार्थ उपलब्ध होणार आहेत, तसेच या बाबीच्या अनुषंगाने शासनावर कोणत्याही प्रकारचा आर्थिक भार न येता बेरोजगारांना रोजगाराची संधी उपलब्ध करुन देता येणार असल्याने प्रस्तूत योजनेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई, यांनी सुचविलेल्या वाहनावरिल फिरते दूध विक्री केंद्राव्दारे आरे दुग्धजन्य पदार्थ विक्री करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई यांनी शिफारस केलेल्या लाभार्थ्यांमधून आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांच्या मान्यतेने लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

२. प्रस्तूत योजनेअंतर्गत बृहन्मुंबई महानगरपालिकेतील प्रत्येक वार्डाकरिता २ वाहनावरील फिरते दूध विक्री केंद्र या प्रमाणे मंजूर करण्यात येत असून प्रथम टप्प्यात ५० विक्री केंद्राना मान्यता देण्यात येत आहे. या विक्री केंद्राचा प्रतिसाद विचारात घेऊन वाढीव विक्री केंद्राच्या मान्यतेबाबत भविष्यात विचार करण्यात येईल.

३. प्रस्तूत योजनेत लाभार्थ्यांची निवड करतांना विहित आरक्षणाचे पालन करण्यात यावे.

४. वाहन खरेदीसाठीचे कोणतेही आर्थिक व इतर दायीत्वे शासनाचे राहणार नसून ते मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई व लाभार्थी यांचे राहील.

५. बृहन्मुंबई महानगरपालिका, परिवहन विभाग व अन्न औषध विभाग यांच्या आवश्यक परवानग्या घेण्याची जबाबदारी लाभार्थ्यांची राहील.

६. निवड केलेल्या लाभार्थ्यांना विक्रीसाठी दूध व दुग्धजन्य पदार्थ उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना वरळी, मुंबई यांची राहील.

७. निवडलेल्या लाभार्थ्यांनी महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना यांचे समवेत आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांनी प्राधिकृत केलेल्या विहित नमुन्यामध्ये करारनामा करणे बंधनकारक राहील.

८. बृहन्मुंबई शिवाय राज्यातील अन्य भागातून या योजनेप्रमाणे मागणी प्राप्त झाल्यास मान्यता देण्याचा विचार करण्यात येईल.

९. या फिरत्या वाहनामधून आरे दूध, दुग्धजन्य पदार्थ व आरे सहउत्पादने विक्री करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००११३०१२३४९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naikwade
Ashok Shivaji

Digitally signed by Naikwade Ashok Shivaji
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ee35d3eddb6baa653600ca8a102ebe878e80bcc3e4aa8982862484ade13ccc4b, serialNumber=289064309a4417dcf339786241d3052e5ddbd6f07628be5505318b15872cbcdc, cn=Naikwade Ashok Shivaji
Date: 2018.10.01 16:29:18 +05'30'

**(अ. शि. नाईकवाडे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री (पदूम) / माच. राज्यमंत्री (पदूम) यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र राज्य.
५. आयुक्त,बृहन्मुंबई महानगर पालिका.मुंबई.
६. आयुक्त ,दुग्धव्यवसाय विकास विभाग,वरळी,मुंबई-१८.
७. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन,मुंबई.
८. आयुक्त,परिवहन विभाग, मुंबई.
९. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),मुंबई/नागपूर.
१०.महाव्यवस्थापक,बृहन्मुंबई दूध योजना,वरळी,मुंबई-१८.
११.सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी.
१२.सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी.
१३.मे.यशोधन युनिर्व्हसल व्हेंचर ग्रूप, मुंबई.
१४.सर्व सहसचिव / उपसचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१५.निवडनस्ती.